# ऐंशी दिवसांत विश्व सफर

## जूल्स वर्न

अनुवाद - रुचिरा सावंत



# ऐंशी दिवसांत विश्व सफर

## जूल्स वर्न

## अनुवाद- रुचिरा सावंत





## प्रकरण १
## प्रवासाला सुरुवात



आज पासून साधारण शंभर वर्षांपूर्वी फिलास फॉग नावाचा एक माणूस होता.
बरीच वर्षे तो निवांत आयुष्य जगला.
तो दररोज एका क्लब ला जायचा.
तो क्लब म्हणजे शहरातील श्रीमंत लोकांच्या भेटीचे मोक्याचे ठिकाण होते.



नेहमी फॉग
आपल्या घरून
बरोबर ११:३०
वाजता निघायचा.
त्यानंतर ५७६
पावले चालल्यावर
तो क्लब ला
पोहोचायचा.

जेवणानंतर फॉग तीन वर्तमानपत्रांची प्रत्येक पाने अगदी मन लावून वाचायचा. त्यानंतर तो संध्याकाळचा नाश्ता करून आपल्या मित्रांसोबत पत्ते खेळायचा.




तिथेच तो दुपारचे जेवण जेवायचा.



रात्रीचे बारा वाजताच फॉग घरी येऊन झोपी जायचा. दुसऱ्या दिवशी सुद्धा तो अगदी हेच करायचा.

पण एका बुधवारी संपूर्ण चित्रच पार बदलून गेलं. फॉगने वृत्तपत्रात एक आश्चर्यजनक बातमी वाचली.

"जरा ही बातमी तर वाचा!" त्याने आपल्या दोस्तांना सांगितलं.

"या बातमी नुसार केवळ ऐंशी दिवसात संपूर्ण जगाची सफर करणे शक्य आहे!"




मित्रांनी चेष्टा केल्यानंतर सुद्धा फॉग ला मात्र विश्वास होता की तो हे कठीण काम नक्की पूर्ण करू शकतो.

जेव्हा एका मित्राने ही गोष्ट असंभव आहे असं म्हणत यावर पैज लावली तेव्हा फॉग म्हणाला,

"मी ८० किंवा त्यापेक्षा कमी दिवसात संपूर्ण विश्वसफर करून दाखवीन. त्यासाठी मी वीस हजार पौंडची पैज लावतो."

फॉगला वेड लागलं आहे असं सगळ्यांना वाटत असताना फॉग ने मात्र ठाम ठरवलं होतं.

"मी आता २१ डिसेंबरला परत येईन.", फॉग ठामपणे म्हणाला.



घरी पोहोताच फॉग ने छोट्याला (त्याच्या नोकराला) सामानाची बांधाबांध करायला सांगितली.

सुदैवाने, छोट्याने या आधी सर्कशीमध्ये काम केले असल्यामुळे त्याने फॉगचे समान चटकन तयार केले.




दहा मिनिटांनंतरच फॉग आपल्या नोकरासोबत स्टेशनला उभा होता...

८:४५ ला रेल्वे स्थानकावरून सुटली आणि या सोबतच फॉग आणि छोट्याच्या विश्व सफरीला सुरुवात झाली.

ते लोक समुद्रकिनाऱ्याच्या दिशेने निघाले होते. तिथून ते फ्रांस ला जाणाऱ्या एका जहाजात बसणार होते. पण तिथे त्यांना काही अडचणींना सामोरे जावे लागण्याची शक्यता सुद्धा नाकारता येत नव्हती.



## प्रकरण २
## आफ्रिकेमध्ये आगमन




जेव्हा फॉग युरोपमधून जात होता तेव्हा तिथले पोलीस एका पसार झालेल्या चोराला पकडण्याच्या प्रयत्नात होते.
काही दिवसांपूर्वीच त्या चोराने बँक ऑफ इंग्लंड मधून ५५ हजार पौंड इतकी मोठी रक्कम चोरली होती.

पोलीस इन्स्पेक्टर फिक्स ने असा अंदाज केला की चोर युरोपातून आफ्रिकेला पळून जाण्याचा प्रयत्न करेल. यासाठीच जेव्हा फॉग सुएज कालव्याला पार करून उत्तर आफ्रिकेला पोहोचला तेव्हा इन्स्पेक्टर फिक्स तिथे बंदरावर चोराची वाट पाहत थांबला होता.



फॉगने आपल्या नोकराला पासपोर्ट वर शिक्का घेण्यासाठी पाठवले. "हे बघ, मला माझ्या या प्रवासाचा पुरावा हवाच आहे." असे फॉगने छोट्याला समजावून सांगितले.

घाईघाईत छोट्याने इन्स्पेक्टर फिक्सलाच पासपोर्ट कार्यालयाकडे जाण्याचा रस्ता विचारला.

पासपोर्ट पाहताच फिक्सचा जीव भांड्यात पडला. फॉगचे वर्णन पसार झालेल्या चोरासोबत अगदी मिळते जुळते होते.  त्यामुळे फिक्सला वाटले की आता लवकरच चोर त्याच्या ताब्यात असेल. लगा कि अब वो जल्द ही चोर को पकड़ लेगा.




परंतु कैद करण्याआधी इन्स्पेक्टर फिक्सला काही कागदपत्रांची आवश्यकता होती.
त्या कागदपत्रांच्या आधारे त्याला कैद करण्याची परवानगी मिळणार होती.

म्हणून फिक्सने फॉग कुठे जातो आहे याची माहिती काढली. त्यानंतर त्याने लंडन येथे तात्काळ टेलिग्राम पाठवला, " मी चोराचा पाठलाग करतो आहे. त्याच्यासोबत मी भारतात जातो आहे. कृपया कैद करण्यासाठी ची आवश्यक कागदपत्रे मुंबई ला पाठवा."



त्यानंतर इन्स्पेक्टर फिक्स आपल्या सामानासह भारताच्या दिशेने जाणाऱ्या जहाजावर दाखल झाला.

प्रवास फार कठीण होता, पण फॉग मात्र जहाजावर पूर्ण वेळ संयमाने होता. तो दिवसातून चार वेळा जेवायचा आणि उरलेला वेळ पत्ते खेळायचा. या दिनक्रमामुळे फॉगला आपण घरी आहोत असेच वाटत होते.

योगायोगाने जहाज मुंबईला ठरल्या दिवसाच्या दोन दिवस आधीच पोहोचले. पण इन्स्पेक्टर फिक्स काही फॉग ला कैद करू शकला नाही. कारण त्याला पकडण्यासाठी आवश्यक असणारी कागदपत्रे अजूनही मुंबईला पोहोचली नव्हती.

“आता एकच आशा राहिली आहे." फिक्सने निश्चय केला, "मला काहीही करून फॉग ला भारताबाहेर जाण्यापासून रोखायला हवे."

भारतात फॉगचा नोकर एका मंदिरात गेला. पण मंदिराबाहेर आपली बूट काढून ठेवायला हवेत याविषयी त्याला काहीच कल्पना नव्हती. एवढेच नाही तर जेव्हा मंदिरातील पुजाऱ्याने त्याला बूट बाहेर काढून ठेवायला सांगितले तेव्हा तो त्याच्याशीच भांडू लागला.

हे पाहताच फिक्सला खूप आनंद झाला. "मी फॉगच्या नोकराला भारतात कायदा मोडताना पाहिलं आहे. आता मी फॉग आणि त्याचा नोकर दोघांनाही भारतामध्ये कैद करू शकतो!"

फिक्सने फॉग आणि छोट्या दोघांचाही पाठलाग केला. त्याने त्या दोघांना एक ट्रेन पकडताना पाहिले.

"चला, आपण आता कोलकात्याला भेटूया." फिक्स स्वत:शीच म्हणाला. "मिस्टर फॉग, मी तुम्हाला तिकडेच कैद करेन."





## प्रकरण ३
## फॉगमुळे बचाव



त्यांची ट्रेन आता सुरू झाली होती. वाटेत त्यांना प्रशस्त मंदिरे, कॉफी आणि कापसाची शेती दिसत होती. छोट्या या नवीन प्रदेशाला नवलाईने पाहत होता.
फॉगला प्रवासात पत्ते खेळणारा एक सहप्रवासी सुद्धा भेटला.

सगळं छान सुरू असताना तिसऱ्या दिवशी मात्र अचानक ट्रेन थांबली.

"इथे रेल्वेचे रूळ संपतात. इथपासून पन्नास मैल दूर अलाहाबाद येथून पुन्हा रेल्वेमार्ग सुरू होईल." मोटरमनने सांगितले.



ट्रेन थांबल्यामुळे नोकराची खूप चिडचिड झाली.
"आता आपण कोलकात्याला वेळेवर कसं बरं पोहोचणार?" त्याने उत्तेजित होत म्हटलं.

फॉग मात्र बिलकुल चिंतीत नव्हता. "मी उशीर होणार हे लक्षात घेऊनच योजना आखली आहे." फॉग शांतपणे उत्तरला. "आता आपल्याला फक्त पुढील प्रवासासाठी साधन शोधण्याची आवश्यकता आहे."

छोट्या, पुढील प्रवासासाठी दुसऱ्या साधनाच्या शोधात निघाला. लवकरच तो उत्तरासोबत परतला.




हत्तीवरून प्रवास थोडा महाग होता पण फॉगला त्यामुळे काहीच फरक पडणार नव्हता. फॉगने तर आपल्या पत्ते खेळणाऱ्या साथीदाराला सुद्धा या सफरीसाठी आमंत्रित केले.

त्यांनी आपल्यासोबत एक मार्गदर्शक सुद्धा घेतला. प्रवास सुरु केल्यापासून अर्ध्या तासानंतर त्यांची वाट एका घनदाट जंगलातून जात होती.
फॉगचा नोकर आनंदाने डुलत होता. थोड्या थोड्या वेळाने तो हत्तीला खाण्यासाठी गुळाची ढेप सुद्धा देत होता.



अशा प्रकारे ते बरेच तास प्रवास करत होते. वाटेत त्यांना खजुराची झाडे आणि रेतीची मोकळी मैदाने पहायला मिळाली. त्या रात्री त्यांनी एका पडक्या वाड्यात आराम केला.

दुसऱ्या दिवशी सकाळी सहा वाजताच त्यांनी आपला प्रवास पुन्हा सुरू केला. न्याहारीसाठी त्यांनी झाडाची  ताजी केळी तोडून खाल्ली. एक घनदाट अरण्य पार करून गेल्यावर त्यांना संगीत आणि माणसांचे आवाज ऐकू येऊ लागले. तिथे झाडांच्या मधून वाट काढत माणसांचा एक समूह जात असताना त्यांच्या नजरेस पडला.

त्या समूहामधील काही सैनिक आपल्या मृत राजकुमाराची तिरडी घेऊन निघाले होते. त्यांच्या पाठोपाठ एक पुजारी एका सुंदर मुलीला खेचत नेत होता.

हे पाहून नोकर सुन्न झाला. "अरे, हे लोक नेमकं काय करण्याचा प्रयत्न करत आहेत?" त्याने जवळपास ओरडूनच विचारले.

"ही इथली रीत आहे." मार्गदर्शकाने समजावून सांगण्याचा प्रयत्न केला.

"जेव्हा राजकुमार मरण पावतो तेव्हा त्याच्या पत्नीला सुद्धा त्याच्या सोबत मृत्यूला जवळ करावे लागते. यामुळे त्या दोघांना एकत्र स्वर्गात प्रवेश मिळतो."

"उद्या राजकुमाराच्या पत्नीला सुद्धा राजकुमारासोबत जाळले जाईल."

छोट्याला हे सहन नाही झाले. इतर वेळी आपला संयम न गमावणारा फॉग सुद्धा हे ऐकून कळवळला.

"हे बघा, अजून बारा तास बाकी आहेत." फॉग म्हणाला, "आपण त्या निर्दोष महिलेला वाचवण्याचा प्रयत्न अजूनही नक्कीच करू शकतो."



रात्रीपर्यंत ते लोक एका छोट्याशा मंदिरात पोहोचले. राजकुमारीला तिथल्याच एका मजबूत खोलीत बंद करून ठेवण्यात आलं. आता राजकुमारीला वाचवण्याची कोणतीच आशा वाटत नव्हती. आणि अशातच नोकराच्या डोक्यात एक भन्नाट कल्पना आली.






दुसऱ्या दिवशी सकाळी राजकुमारीला सुद्धा आपल्या मृत पतीच्या शेजारी तिरडीवर झोपवण्यात आलं. त्यानंतर पुजाऱ्यांनी मोठी आग लावली. सारी जनता तोंडातून एक अवाक्षरही न काढता हे सारं पाहत होती.
अचानक अवतीभवती लोकांच्या आरोळ्या उठल्या. काही लोक उठून नेमकं काय झालंय हे जाणून घेण्याचा प्रयत्न करू लागले. त्यांनी पाहिलं की मृत राजकुमार आपल्या तिरडीवर उठून बसला होता.

त्याची ती कोड्यात टाकणारी भुतासारखी प्रतिमा धूसर वातावरणामधून मार्ग काढत उठली आणि राजकुमारीला उचलून घोड्यावर स्वार होऊन जंगलामध्ये कुणाला काही कळण्याआधीच विलीन झाली.



"चला, निघुया." भुताने फॉगला सांगितलं. ते भूत म्हणजे दुसरं तिसरं कुणी नसून फॉगचा नोकर होता. छोट्यानेच स्वतः राजकुमाराचा वेष केला होता. आता ते सगळे तिथून पळाले. त्यांच्या पाठून समूहातील लोकांनी त्यांच्यावर हल्ला केला. ते त्यांचा पाठलाग करू लागले. परंतु ते लोक बंदुकीच्या गोळ्या आणि भाल्यांपासून स्वतःचे रक्षण करत कसेबसे तिथून पळाले.



## प्रकरण ४
## विश्वासघात



अलाहाबाद येथे पोहोचल्यावर फॉगने हत्ती आपल्या मार्गदर्शकाच्या ताब्यात दिला. आता तो आपल्या नोकरासोबत ट्रेन मध्ये चढला. पण कोलकात्याला उतरताच फॉग व त्याच्या नोकराला पोलिसांनी पकडले आणि पोलीस ठाण्यात घेऊन गेले.

फॉगने आपल्या नोकरसोबत एक आठवडा तुरुंगात घालवला. नोकराला अर्थातच हे बिलकुल आवडले नाही. त्यानंतर न्यायालयाने फॉगला दोन हजार पौंड इतका दंड केला.

"ठीक आहे." न्यायाधीश म्हणाले. "तू आत जाण्यासाठी मुक्त आहेस. पण तू परत नाही आलास तर आम्ही तुझी जमा केलेली रक्कम जप्त करू."




फॉग आता हाँगकाँगला जाणाऱ्या जहाजात चढला. जहाज सुरू व्हायला आणखी तासभर बाकी होता.

फिक्सची तर फार चिडचिड होत होती. "हॉंगकॉंग तर ब्रिटिश वसाहत आहे. मी तिथे फॉगला नक्कीच कैद करू शकेन." तो स्वतःशीच म्हणाला.

ज्या राजकुमारीला फॉगने वाचवलं होतं ती सुद्धा आपल्या चुलत भावाला भेटण्यासाठी यांच्यासोबत हॉंगकॉंगला जात होती. जेव्हा त्यांचे जहाज हॉंगकॉंग मध्ये कोळसा भरण्यासाठी थांबले तेव्हा फॉग आणि ती राजकुमारी एका घोडागाडीत बसून शहर फिरण्यासाठी निघाले.

तिथे रस्त्यात त्यांना काळी मिरी आणि जायफळाची झाडं दिसली. त्यांना वाकुल्या दाखवणाऱ्या माकडांचे कळप आणि गर्जना करणारे चित्ते सुद्धा पहायला मिळाले.



प्रवासाच्या शेवटच्या टप्प्यात असताना त्यांच्या जहाजाला वादळाला सामोरे जावे लागले. खूप जोराचा वारा सुटला होता. फॉग या सगळ्यादरम्यान शांत राहिला असला तरी त्याचा नोकर मात्र घाबरला होता. "मला वाटतं की आपण आपलं पुढचं जहाज नाही पकडू शकत." तो घाबरून म्हणाला.

परिणामतः ते हाँगकाँगला एक दिवस उशिराने पोहोचले. जपानमधील योकोहामा येथे जाणारे जहाज यामुळेच फॉगला पकडता आले नाही.

"मला माहित होतं असंच काहीतरी होणार आहे." नोकर म्हणाला.

इन्स्पेक्टर फिक्सला मात्र खूप आनंद झाला.

तो मनाशी म्हणाला, "फॉग, आता मी तुला नक्की कैद करू शकतो." परंतु नियतीला हे मान्य होते असे दिसत नव्हते. त्याच्या नशिबी काहीतरी वेगळेच होते.

काहीतरी अपरिचित कारणामुळे योकोहामाला जाणाऱ्या जहाजाला सुद्धा उशीर झाला.आणि त्यामुळेच फॉग त्या जहाजात चढू शकला. दुर्दैवाने इन्स्पेक्टर फिक्सची कागदपत्रे मात्र अजूनही आलेली नव्हती.

आता इन्स्पेक्टर फिक्स खूपच चिंतेत आणि निराश होते. कागदपत्रे येईपर्यंत फॉगला तिथेच हाँगकाँगला थांबवण्याचा त्याचा मनसुबा होता.



त्यादिवशी रात्री फॉगनी एका हॉटेलात आपल्या राहण्याची व्यवस्था केली आणि मग तो राजकुमारीच्या चुलत भावाला शोधायला निघाला. त्याने आपल्या नोकराला जहाजमध्ये तीन जागा राखून ठेवण्यासाठी पाठवून दिले.

बंदरावर पोहोचल्यावर नोकराला समजले की जहाज त्याच दिवशी संध्याकाळी रवाना होणार आहे. ही बातमी आतापर्यंत फिक्स पर्यंत सुद्धा पोहोचली होती.




"मला आता माझ्या मालकाला शोधायला हवे." फॉगचा नोकर रडवेला होऊन म्हणाला. पण या संधीचा फायदा घेत इन्स्पेक्टर फिक्सने मात्र त्याला एका कोंदट जागी दारू पिण्यासाठी नेले.

"मी एक गुप्तहेर आहे आणि तुझा मालक एक खूप मोठा चोर आहे." फिक्सने त्या कोंदट जागी नोकराला सांगितले.

"काहीतरीच काय!" फिक्सचे बोलणे ऐकताच नोकर ओरडला.

"जहाज आज संध्याकाळी निघणार आहे हे फॉगला समजता काम नये." फिक्सने विचार केला. त्यामुळे त्यासाठी त्याने नोकराला खूप दारू पाजली.

काही वेळातच छोट्या नशेमध्ये झिंगायला लागला आणि त्यातच त्याला तिथेच झोप लागली. या सगळ्यादरम्यान इन्स्पेक्टर फिक्स तिथून चुपचाप निघून गेला.



दुसऱ्या दिवशी सकाळीच फॉग बंदरावर पोहोचला. राजकुमारीसुद्धा त्याच्या सोबत होती. राजकुमारीचा भाऊ हॉंगकॉंग सोडून गेला होता. आता फॉगचे जहाज सुद्धा हॉंगकॉंगहुन रवाना झाले होते. आणि फॉगच्या नोकराचा कुठेच पत्ता नव्हता.




दुसरं जहाज एक आठवड्यानंतर निघणार होतं. पण फॉग हिम्मत न हरता प्रयत्न करत राहिला. जपानला पोहोचता येईल अशा दुसऱ्या जहाजाचा शोध ते घेत राहिले.

शेवटी फॉगला एका छोट्या जहाजाचा कप्तान भेटला. तो त्यांना शांघाय पर्यंत घेऊन जायला तयार झाला.

"तुम्ही शांघायहून योकोहामाला जाण्यासाठी दुसरा स्टीमर  पकडू शकता." त्याने सांगितलं. बंदरावरच फॉगला इन्स्पेक्टर फिक्स भेटले. त्यांनी फिक्स ला सुद्धा आपल्यासोबत येण्याचे निमंत्रण दिले.

जहाज निघण्याआधी फॉगने हॉंगकॉंगला एक पूर्ण फेरी मारून शोध घेतला पण त्यांना छोट्या कुठेच भेटला नाही.



दोन दिवस त्यांचं छोटंसं जहाज लाटांशी झुंजत वाट काढत पुढे जात होतं. त्यानंतर मात्र एक तुफान आलं आणि एक विशालकाय लाट जहाजावर येऊन आदळली. आता जहाज सुमुद्रात एखाद्या चेंडू सारखं इथे तिथे भिरकावलं जात होतं.

माझी तब्येत बरी नाही.

वादळ शांत होईपर्यंत त्यांचा बराचसा वेळ वाया गेला होता. सगळे शीड लावून सुद्धा त्यांचे जहाज वेगाने पुढे सरकत नव्हते.

तेवढ्यात फॉगला एक स्टीमर येताना दिसले.

"हा स्टीमर शांघायहून योकोहामाला जात आहे." जहाजाच्या कप्तानाने सांगितलं.

"त्या स्टीमरला इशारा करून थांबवा." फॉग म्हणाला.



त्यानंतर एका धमाक्यासोबत एक रॉकेट गतीने त्या स्टीमरच्या दिशेने गेलं. स्टीमर थांबलं आणि मग फॉग, राजकुमारी आणि फिक्स त्यात स्वार झाले.

पण या सगळ्यादरम्यान इथे फॉगच्या बिचाऱ्या नोकरासोबत काय घडलं माहित आहे?

नेमकं जपानला जाणारं जहाज निघण्याच्या वेळी त्याचे डोळे उघडले. तो धावत पळत जहाजावर पोहोचला. तिथे फॉग न दिसल्यामुळे त्याला खूप दुःख झालं.

म्हणूनच योकोहामाला पोहोचल्यावर छोट्या संभ्रमात पडला. त्याला समजेचना की आता काय करावं. तो इथे तिथे भटकत राहिला. आणि तेवढ्यात त्याला एक पत्रक दिसलं.




"जर मला त्या कलाकारांच्या समूहात समाविष्ट होता आलं तर किती छान होईल! ते इथून अमेरिकेला जात आहेत. मिस्टर फॉग सुद्धा जपानहून अमेरिकेला जाणार होते.

"तू तुझ्या डोक्यावर उभा राहून गाणं गाऊ शकतो का? डाव्या पायावर एक जण उभं राहून उजव्या पायावर तलवार असेल तुझ्या. तू हे करू शकशील?" सर्कशीच्या मालकाने विचारलं.
फॉगच्या नोकराने होकारार्थी मान हलवली. "चल मग, तू आमच्या सोबत चल." मालक म्हणाला.



त्या दिवशी त्याने पहिल्या कार्यक्रमात भाग घेतला. तो कलाकारांच्या त्रिकोणात सर्वात खाली होता. लोकांना कार्यक्रम फार आवडला. पण अचानक...



सारे कलाकार खाली पडले.



छोटूला मिस्टर फॉग दिसले होते आणि तो त्यांच्या दिशेने धावला होता.



## प्रकरण ५
## घराच्या दिशेने



त्यांच्याजवळ आता एकमेकांना आपल्या कहाण्या ऐकवण्यासाठी वेळ नव्हता. त्यांनी धावतच सॅन फ्रान्सिस्को ला जाणारे जहाज पकडले. राजकुमारीजवळ इतर कुठेही जाण्याचा पर्याय नव्हता त्यामुळे ती सुद्धा त्यांच्यासोबतच निघाली. खरं तर दिवसागणिक ती फॉगवर प्रेम करू लागली होती.

जसजसे जहाज पुढे सरकत होते तसतसा मिस्टर फॉग आपली पैज जिंकतील यावरचा छोटूचा विश्वास दृढ होत होता. पण अचानक एक दिवस जहाजाच्या डेक वर त्याला इन्स्पेक्टर फिक्स दिसला. तो गुप्तरूपात त्यांचा पाठलाग करत होता.




फॉगच्या नोकराने फिक्सला दणदणीत ठोसा दिला.

"थांब!" फिक्स ओरडला. "कदाचित मी या आधी तुझ्या विरोधात होतो..."

"तू होताच..." नोकर चिडून म्हणाला.

"ठीक आहे." मान्य करत फिक्स म्हणाला, "मला अजूनही असं वाटतं की फॉग चोर आहे. पण आता फॉग लंडनला पोहोचावा अशी माझीसुद्धा इच्छा आहे. कारण मी त्याला आता इंग्लंडलाच पकडू शकतो."

छोट्याला आपल्या मालकाला त्रास द्यायचा नव्हता. म्हणूनच त्याने मिस्टर फॉगला फिक्स विषयी काहीच सांगितले नाही. पण जेव्हा फॉग सॅन फ्रान्सिस्कोला पासपोर्टवर शिक्का घेण्यासाठी गेला तेव्हा अचानक त्याला फिक्स भेटला.

"किती आश्चर्यकारक गोष्ट आहे ना!" फिक्स खोटं खोटं म्हणाला. त्यानंतर तोसुद्धा त्याच ट्रेनमध्ये चढला ज्यामध्ये फॉग प्रवास करत होता. ही ट्रेन त्यांना अमेरिकेच्या पलीकडे नेणार होती.



पॅसिफिक रेलरोड संपूर्ण अमेरिकेला पार करून न्यूयॉर्कला पोहोचत असे. ट्रेन सगळ्याप्रकरच्या सुखसोयींनी युक्त होती. तिथे दुकाने आणि उपहारगृहे सुद्धा होती.
परंतु जेव्हा रानरेडे रूळ ओलांडत तेव्हा ट्रेनला थांबावे लगे.

थोडं पुढे गेल्यावर एका कमकुवत पुलावरून जायचे होते. "मी या पुलाला संपूर्ण गतीने पार करेन." मोटरमन म्हणाला. धांदलीत त्याने ट्रेनची गती इतकी वाढवली की तिची चाकं रुळावरून उचलली गेली.

ट्रेन जवळपास उडतच पुलाच्या दुसऱ्या बाजूला पोहोचली. परंतु ट्रेन पुलाच्या दुसऱ्या बाजूला पोहोचताच पूल तुटून नदीत पडला.



त्यानंतर त्यांना खऱ्या समस्येचा सामना करावा लागला. ट्रेन पहाडांमधून जात असताना काही सिऊक्स योद्ध्यांनी ट्रेनच्या छतावर उडया मारल्या. आणि लवकरच त्यांनी ट्रेन आपल्या ताब्यात घेतली.






ट्रेनच्या खाली रांगत रांगत तो इंजिनपर्यंत पोहोचला. आणि असं करत असताना त्याला कुणीच नाही पाहिलं.

त्यानंतर त्याने शिताफीने इंजिनला ट्रेनपासून वेगळं केलं. काही वेळानंतर ट्रेन एका स्टेशनपाशी येऊन थांबली.



असं म्हणतच फॉगचा नोकर कामाला लागला.

काही कालावधी नंतर फॉग आपल्या नोकराला शोधू लागला. पण तो त्याला कुठेच दिसला नाही.

"योद्धे, तुमच्या नोकराला आपल्यासोबत बंदी बनवून घेऊन गेले." गार्ड म्हणाला.

त्यानंतर लगेच फॉग काही सैनिकांना सोबत घेऊन छोटुच्या शोधात पर्वतांमध्ये गेला.



छोटूला शोधून त्याला सोडवण्यात त्याचा पूर्ण दिवस गेला. रात्री त्यांना तिथेच मुक्काम करावा लागला. ते सकाळीच स्थानकावर परतले.

ते तिथे पोहोचेपर्यंत त्यांची ट्रेन निघून गेली होती. आणि पुढची ट्रेन संध्याकाळी होती.

“माझ्याकडून पुन्हा एकदा चूक झाली." छोटू रडत रडत म्हणाला. पण यावेळी फिक्स त्यांच्या मदतीला आला. तो म्हणाला, "मला आताच एक माणूस भेटला ज्याच्याजवळ बर्फावर घसरणारी नाव आहे."

पुढच्या काही वेळातच ते बर्फावर घसरत होते. जोराचा वारा नावाच्या शिडाला धक्का देत होता, ज्यामुळे नाव बर्फावरून आणखी गतीने घसरत होती.



ते इतक्या गतीने पुढे सरकले की पुढच्याच स्थानकावर त्यांना न्यूयॉर्कला जाणारी ट्रेन पकडता आली. त्यानंतर ट्रेन धुराच्या लोटात फार गतीने पुढे सरकत होती. अजूनही फॉग ही पैज जिंकण्याची शक्यता नाकारता येत नव्हती.

शेवटी एकदाचे ते हडसन नदीकिनारी न्यूयॉर्क ला पोहोचले. पण इंग्लंडला जाणारे जहाज पंचेचाळीस मिनिटांपूर्वीच तिथून निघाले होते.



इतर कोणतेच स्टीमर त्यांना अटलांटिक महासागर पार करून वेळेत पोहोचवू शकत नव्हते. फॉगचा नोकर निराश झाला तरी फॉग मात्र बंदरातील प्रत्येक जहाजात जाऊन चौकशी करत होता. शेवटी त्याला एक जहाज मिळालंच ज्याचा कप्तान मुसाफिरांना सोबत घ्यायला तयार झाला.

ते जहाज फ्रान्सला जात होतं. पण फॉगला त्यामुळे काहीच फरक पडत नव्हता. फॉगने जहाजाच्या कप्तानाला एका खोलीत बंद करून टाळं लावलं. मग फॉगने जहाज आपल्या ताब्यात घेतलं आणि जहाजाची दिशा बदलली.

जहाज फार गतीने जात होतं. पण थंडीच्या दिवसांमध्ये वारासुद्धा जोराने वाहत होता. तेवढ्यातच एका इंजिनिअरने येऊन फॉगला एक वाईट बातमी दिली.

"बॉयलर मध्ये जळणार कोळसा संपत आला आहे." तो घाबरतच म्हणाला.



“ या समस्येला तर माझा बुद्धिमान मालक सुद्धा सोडवू शकत नाही." नोकर  हताश होत म्हणाला.

पण पुन्हा एकदा फॉगने आपल्या चातुर्याने लोकांना अचंबित केले. त्याने नाविकांना शिडाचे लाकूड कापून त्याचे तुकडे करायला सांगितले आणि त्यांना जहाजाच्या बॉयलरमध्ये जाळायला सांगितले.

तीन दिवसातच नाविकांनी जहाजाचा पूल कापून जाळला.



त्यानंतर केबिन...





आणि त्यानंतर जहाजाचा डेक...



शेवटी जहाज जेव्हा इंग्लंडला पोहोचले तेव्हा केवळ त्याचे लोखंडी कवच च शिल्लक राहिले होते.

त्यांचे जहाज लिव्हरपूरला थांबले. तिथून फॉगला फक्त एक ट्रेन पकडून लंडनला जाऊन आपली पैज पूर्ण करायची होती. पण जहाजातून उतरताच इन्स्पेक्टर फिक्सने आपला डाव साधला.

"फिलास फॉग," फिक्स म्हणाला, "मी तुला पंचावन्न हजार पौंड च्या चोरीच्या आरोपात अटक करत आहे."



फॉगला तुरुंगात बंद केले गेले. त्याचा नोकर आणि राजकुमारी, त्याला वाचवण्यासाठी काहीच करू शकले नाहीत.

ते एखाद्या चमत्काराची अपेक्षा करत बसले असताना तीन तासानंतर फिक्स धावत पळत तेथे आला. त्याचे केस अस्ताव्यस्त झाले होते आणि तो अपराधी वाटत होता. "मी खूप मोठी चूक केली आहे." तो रडवेला होऊन म्हणाला.



फॉग आता पुन्हा एकदा मुक्त होता. पण आता त्याच्याजवळ फक्त साडे पाच तासच बाकी होते.

फॉग एका विशेष ट्रेनने लंडनला रवाना झाले. ती ट्रेन लंडन स्थानकावर ८:५५ वाजता पोहोचली. आणि या सोबतच फॉग आपली पैज दहा मिनिटांनी हरला होता.






## प्रकरण ६
## या पुढे काय?



फॉगला काय वाटत होते याविषयी त्याच्या चेहऱ्यावरून काहीच कल्पना येत नव्हती. स्थानकावरून आपल्या नोकराला आणि राजकुमारीला घेऊन तो सरळ घरी आला. त्याने किती पैसे गमावले याचा त्याने दुसऱ्या दिवशी हिशोब केला.

सकाळी सात वाजताच फॉग, राजकुमारीच्या खोलीत गेला.

"मॅडम, इंग्लंडला परतल्यावर तुम्हाला खूप धन-दौलत देण्याची माझी इच्छा होती. पण आता ते शक्य होईल असं वाटत नाही." फॉग राजकुमारीला म्हणाला.

"महाशय, मला तुमचे पैसे नकोत. मला फक्त तुमची साथ हवी आहे." राजकुमारी लाजत म्हणाली.




हे ऐकताच फॉग खूप आनंदी झाला. त्याने त्वरित नोकराला बोलावले आणि सांगितले, " लवकर चर्चला जाऊन तिथे उद्यासाठी आमच्या लग्नाची व्यवस्था कर."

सोमवारी सकाळी!!

सोमवारी सकाळी!!

या दरम्यान फॉगचे मित्र मागचे काही दिवस फारच उत्तेजित होते. दोन ऑक्टोबरला निघाल्यापासून फॉगची काहीच खबरबात त्यांना मिळाली  नव्हती.

२१ डिसेंबरच्या संध्याकाळी फॉगचा सारे मित्र खूपच अस्वस्थपणे त्याची वाट पाहत होते. आणि जसे घड्याळात ८:४४ झाले तशी दरवाजावर ठकठक झाली.




फिलास फॉग आपल्या दोस्तांसमोर प्रत्यक्ष हजर होता. पण फॉगने हे कसं बरं जमवलं?

चर्चच्या पाद्रीकडून परतल्यानंतर फॉगच्या नोकराने त्याला एक अविश्वसनीय खबर ऐकवली.

"उद्या सोमवार नाही." नोकर हसत हसत म्हणाला. " उद्या तर रविवार आहे, आणि आज शनिवार!"



फॉग पूर्वेकडून प्रवास करून आला असल्यामुळे त्याच्याजवळ एक दिवस अजूनही शिल्लक होता. क्लबला जाऊन पैज जिंकायला त्याच्याजवळ अजूनही दहा मिनिटे शिल्लक होती.

फॉगने वीस हजार पौंड जिंकले. पण त्या संपूर्ण प्रवासात त्यांच्याकडून जवळपास एकोणविस हजार पौंड खर्च सुद्धा झालेले. त्यामुळे त्यांना त्या बक्षिसाचा काही खास फायदा झाला नाही.

पण या संपूर्ण प्रवासात त्यांनी विश्व दर्शनाची मजा अनुभवली होती. सोबतच फॉगला एक छानशी बायको सुद्धा भेटली. बरेचसे लोक या पेक्षा फारच कमी पैशातही जगाची सफर करू शकले असते.




## Fogg's route

1 London, England
2 Paris, France
3 Turin, Italy
4 Suez, Egypt
5 Bombay, India
6 Allahabad, India
7 Calcutta, India
8 Singapore
9 Hong Kong
10 Shanghai, China
11 Yokohama, Japan
12 San Francisco, America
13 New York, America
14 Liverpool, England

जूल्स वर्नचे प्रसिद्ध पुस्तक

ऐंशी दिवसांत विश्व सफर

शंभर वर्षांनंतर आजसुद्धा लहान मुलांना फार आवडते.

